**रोहा येथील स.नं.३५६ क्षेत्र ०-३६.८ व स.नं.२७४ मधील क्षेत्र ०-०७.० हे.आर असे एकूण क्षेत्र ०-४३.८ हे.आर इतकी शासकीय जमिन" सार्वजनिक प्रयोजन" करिता रोहा नगरपरिषदेला मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१७/प्र.क्र.४१६/ज-४अ**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

१ ला मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २४. ०८. २०१७

संदर्भ: १) विभागीय आयुक्त, कोंकण यांचे क्र. मशा/कार्या-१/जमीन-१/CO/प्र.क्र.४३७-१७७४२/२०१७ दि.१६.०५.२०१७

२) जिल्हाधिकारी, रायगड यांचे मशा/जमीन/अ-०३/४२५५५७/२०१७ दि.१२.०४.२०१७

३) रोहा नगर परिषद यांचे पत्र क्र.रो.न.प/बां.वि/आ.क्र.१४/९४७/२०१७/दि.०३.०८.२०१७

प्रस्तावनाः-

नगर परिषद रोहा यांना रोहा शहर सुधारित मंजूर विकास आराखड्यातील आरक्षण क्र.१४-सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजन (सार्वजनिक उपक्रम) या आरक्षणाने बाधीत होणा-या स.नं.३५६ क्षेत्र ०-३६.८ व स.नं.२७४ मधील क्षेत्र ०-०७.० हे.आर असून एकूण क्षेत्र ०-४३.८ हे.आर ही शासकीय जमिन रोहा नगरपरिषदेकडे रु.१ नाममात्र मोबदला घेऊन भाडेपट्टयाने मिळणेबाबतचा प्रस्ताव विभागीय आयुक्त कोकण यांचे मार्फत शासनास प्राप्त झालेला आहे. शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सार्वजनिक सुविधांची आरक्षणे वगळता नगरपरिषदेस महसूल मुक्त/भोगाधिकार मुल्यरहित जमीन देण्याची तरतूद नाही. महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ अंतर्गत महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम, १९७१ मधील नियम ५ व ६ यातील तरतूदीनुसार शाळा किंवा महाविद्यालये, रुग्णालये, दवाखाना इतर बांधकामे ज्यापासून कोणत्याही लाभाची अपेक्षा नाही अशाच प्रयोजनासाठी नगरपरिषदांना भोगाधिकार मुल्यरहित शासकीय जमीन देता येऊ शकते. रोहा नगरपरिषदेस सदर जागेवरील प्रस्तावित वाणिज्यिक व सार्वजनिक प्रयोजनाचे अनुषंगाने प्रचलित विकास नियंत्रण नियमावली प्रमाणे वाणिज्यिक वापरासाठी आवश्यक जागेकरिता रोहा शहराचा सुधारित मंजूर विकास आराखडा प्रसिध्द करण्यात आलेल्या वर्षाच्या शिघ्रसिध्दगणकानुसार होणारे मुल्यांकन आकारुन तसेच उर्वरीत शासकीय जमीन रुपये १/- नाममात्र

मोबदला घेऊन कब्जेहक्काने नगर परिषद रोहा यांना मंजूर करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ह्या संदर्भात दिनांक १०.०८.२०१७ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचार विनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

## शासन निर्णय:-

नगर परिषद, रोहा यांना रोहा शहर सुधारित मंजूर विकास आराखड्यातील "आरक्षण क्र.१४- सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजन (सार्वजनिक उपक्रम)" या आरक्षणाने बाधीत होणा-या स.नं.३५६ क्षेत्र ०-३६.८ व स.नं.२७४ मधील क्षेत्र ०-०७.० हे.आर असे एकूण क्षेत्र ०-४३.८ हे.आर जमीन रोहा नगरपरिषदेस महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ चे कलम ४० तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे) नियम, १९७१ च्या नियम ५ व ६ अन्वये शासनास प्राप्त अधिकारांचा वापर करुन प्रचलित विकास नियंत्रण नियमावली प्रमाणे वाणिज्यिक वापरासाठी आवश्यक जागेकरिता रोहा शहराचा सुधारित मंजूर विकास आराखडा प्रसिध्द करण्यात आलेल्या वर्षाच्या शिघ्रसिध्दगणकानुसार होणारे मुल्यांकन आकारुन तसेच उर्वरीत शासकीय जमीन रुपये १/- नाममात्र मोबदला घेऊन कब्जेहक्काने नगर परिषद रोहा यांना कब्जेहक्काने मंजूर करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

## अटी व शर्ती -

(i) सदर जागा वाटपासाठी निर्बाधरीत्या उपलब्ध आहे, याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी.

(ii) नगर परिषद, रोहा यांना रोहा शहर सुधारित मंजूर विकास आराखड्यातील "आरक्षण क्र.१४- सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजन (सार्वजनिक उपक्रम)" या आरक्षणाने बाधीत होणा-या स.नं.३५६ क्षेत्र ०-३६.८ व स.नं.२७४ मधील क्षेत्र ०-०७.० हे.आर असे एकूण क्षेत्र ०-४३.८ हे.आर ही शासकीय जमीन रोहा नगरपरिषद भोगवटादार वर्ग-२ या धारणाधिकाराने धारण करील. त्याचप्रमाणे शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर जमीन किंवा तिचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबध विक्री / देणगी देऊन / अदला बदल करुन / गहाण ठेऊन / पट्ट्याने देऊन / खाजगी-सार्वजनिक सहभाग तत्वावर किंवा बाह्य यंत्रणाद्वारे किंवा अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरित करणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/ संस्था/ कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार अर्जदारास करता येणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमीनीचे पोटविभाजन करता येणार नाही.

(iii) रोहा नगरपरिषद विषयांकित शासकीय जमिनीचा वापर केवळ मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी करील. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी सदर जमिनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा तात्पुरता अथवा कायमस्वरुपी वापर करावयाचा झाल्यास त्यासाठी शासनाच्या महसूल व वन विभागाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

(iv) विषयांकित शासकीय जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजुर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास करणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त आवश्यकते प्रमाणे अन्य संबधित विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी / ना-हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

(v) प्रस्तावित प्रयोजनाच्या व सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश / सूचना या प्रकरणी रोहा नगरपरिषदेस बंधनकारक रहातील व त्यानुषंगाने आवश्यक खबरदारी / काळजी घेणे बंधनकारक राहील.

(vi) सदर शासकीय जमिनीचा ताबा मिळाल्यापासुन ३ वर्षांच्या आत मंजूर प्रयोजनासाठी वापर सुरु करणे रोहा नगरपरिषदेस बंधनकारक राहील.

(vii) "सार्वजनिक प्रयोजना" करिता प्रदान करण्यात आलेल्या उक्त शासकीय जागेवर सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बांधकाम करुन त्याचा वापर करण्याची व ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम २००० च्या तरतुदीचे तंतोतंत अनुपालन करण्याची दक्षता रोहा नगरपरिषदने घेणे बंधनकारक राहील.

(viii) प्रस्तावित प्रयोजनामुळे लगतच्या खातेदारांना कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही व त्यांच्या वैध वहिवाटीस बाधा येणार नाही याबाबत रोहा नगरपरिषदेने दक्षता घ्यावी.

(ix) शासकीय जमीन मंजुरीसंदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

(x) वरील अटी / शर्तीपैकी कोणत्याही अटी / शर्तीचा भंग केल्यास शर्तभंगाबाबत सदर शासकीय जमीन शासनजमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

(xi) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग/ जिल्हाधिकारी, रायगड यांना आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती विहित करण्याची मुभा राहील.

(xii) रोहा नगरपारिषदेस उक्त शासकीय जमीन भोगाधिकार मूल्यरहित देण्याची बाब पूर्वोदाहरण म्हणून मानण्यात येऊ नये.

सदर शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाशी विचारविनिमय करून त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४८/२०१७/व्यय-९, दि.०९.०८.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२४१६३२५५४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Madhav Veer

Digitally signed by Madhav Veer
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22edaeda6d9d0b7d64088adc780cd25e6, cn=Madhav Veer
Date: 2017.08.24 16:23:25 +05'30'

**( डॉ.माधव वीर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई -३२.
७. अप्पर मुख्य सचिव (वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई -३२.
८. प्रधान सचिव (नगर विकास) नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.
९. प्रधान सचिव (महसूल) यांचे विकाअ/स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई -३२.
१०. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई.
११. जिल्हाधिकारी, रायगड.
१३. मुख्य अधिकारी, नगर परिषद, रोहा.
१४. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई -३२.
१५. मा. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर
१६. नगर विकास विभाग (नवि-१२) , मंत्रालय,मुंबई -४०० ०३२,
१७. वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय,मुंबई -४०० ०३२,
१८. निवडनस्ती, कार्यासन ज-४अ, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई -३२.